सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) अंतर्गत कार्यान्वित राज्य नोडल खात्यामध्ये लेखाशीर्ष (२२१५ ९८५३) खाली प्राप्त केंद्र हिश्श्याचा निधी जमा करणेबाबत

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः जेजेएम-२०१९/प्र.क्र.१५९/पापु १०
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: १३ मार्च,२०२०

वाचा-

१. संयुक्त सचिव, पेयजल व स्वच्छता मंत्रालय, भारत सरकार यांचे अर्धशासकीय पत्र क्र.PD-२६०२५/३/२०१९/SBM, दि.२९ मे, २०१९
२. अवर सचिव, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र.क्र. W-11020/197/2015 दि.२५ नोव्हेंबर,२०१९
३. शासन निर्णय, समक्रमांक दि.६ मार्च,२०२०

प्रस्तावना-

वाचा क्र.१ येथील पत्रान्वये सर्व केंद्र सहाय्यीत योजनांकरीता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली कार्यान्वित करण्याबाबत सूचित केले आहे. त्याअनुषंगाने राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या केंद्र सहाय्यीत योजनेअंतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली कार्यान्वित करण्याकरीता विभाग स्तरावर आय.सी.आय.सी.आय. बँकेत राज्य नोडल खाते (State Nodal Account) उघडण्यात आले आहे. जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने वाचा क्र.२ अन्वये सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरीता राज्यातील आदिवासी घटक उपयोजनेकरीता निधी उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत (जल जीवन मिशन) कार्यान्वित करावयाच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यात जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरीता आदिवासी घटक उपयोजनेकरीता रु.५०.५१६४ कोटी (अक्षरी-रु. पन्नास कोटी एकावण्ण लक्ष चौसष्ट हजार फक्त) इतका निधी वाचा.क्र.१ अन्वये राज्यास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी आदिवासी विकास विभागाने मागणी क्र.टी-५, २२१५ - पाणी पुरवठा

व स्वच्छता, जनजाती क्षेत्र उपयोजना, जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना, (०१) पाणी पुरवठा, ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) (०९) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम २२१५ (केंद्रीय हिस्सा) ९८५३ मधील ३१- सहाय्यक अनुदाने, (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरीता अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहेत. या लेखाशीर्षान्तर्गत सद्यस्थितीत अखर्चित असलेला रु.१४,५१,६४,०००/- (अक्षरी- रुपये चौदा कोटी एकावण्ण लक्ष चौसष्ट हजार फक्त) निधी तात्काळ राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत (जल जीवन मिशन) सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता आय.सी.आय.सी.आय बँकेच्या ओपेरा हाऊस, मुंबई शाखेत (IFSC Code- ICICI००००३४८) उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खाता क्र.०३४८०१००४४१७ मध्ये जमा करण्यात यावा.

| | |
|---|---|
| **आय.सी.आय.सी.आय बँकेतील खातेक्रमांक** | **०३४८०१००४४१७** |

२. सदर रक्कम आहरित करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी अवर सचिव (रोखशाखा) (श्री.पां.रा.खोटरे) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव (श्री.रा.म.गेंगजे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम (श्री.पां.रा.खोटरे) आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी आय.सी.आय.सी.आय बँकेच्या ओपेरा हाऊस, मुंबई शाखेत (IFSC Code- ICICI००००३४८) उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खाता क्र.०३४८०१००४४१७ मध्ये जमा करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१३१५१५०२१३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, street=WATER SUPPY AND SANITATION DEPARTMENT,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=0edd9c3872935c071332e1f94cbcdc9828471b3251eee2d5c23fd681ec41cefa, ou=WATER SUPPY AND SANITATION DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2020.03.13 18:59:20 +05'30'

**बाळासाहेब हजारे**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर

२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
५. उप सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

**प्रत माहितीस्तव,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
४. कक्ष अधिकारी/ लेखाधिकारी (कार्यासन पापु-०५/२०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
५. निवडनस्ती कार्यासन पापु-१०